# जन वाचन आंदोलन





जनवाचन आंदोलन हे पुस्तकांना गावागावात घेऊन जाणारे आंदोलन आहे. नवसाक्षर व अर्धशिक्षित लोकांमध्ये पुस्तकांचे सामुदायिक वाचन करणे, ते ऐकणे आणि ऐकवणे हा याचा उद्देश आहे. आज गावातल्या लोकांपर्यंत पुस्तके पोचत नाहीत. त्यांची भाषा त्यांना उमगत नाही आणि किंमती परवडत नाहीत. अशा नववाचकांपर्यंत पुस्तके पोचवण्याचे काम भारत ज्ञान विज्ञान समितीने अंगिकारले आहे. ही पुस्तके प्रसिद्ध लेखकांची आणि सोपी, सुटसुटीत व स्वस्त किमतीत असावीत असा प्रयत्न आहे.

या आंदोलनातून काय साध्य होईल?

गावागावात जनवाचनाची व जनवाचनालयांची संस्कृती निर्माण होईल. साक्षरता आंदोलनातून हस्तगत केलेली अक्षरकौशल्ये लोक स्वतः विकसित करू शकतील. त्यांच्या ज्ञानविज्ञानाच्या कक्षा विस्तारतील. त्यांच्या सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक जाणिवांची पातळी उंचावू शकेल. आपल्या मूलभूत हक्कांच्या आणि एकंदर परिवर्तनाच्या लढ्यासाठी जागृत होऊन ते उभे ठाकू शकतील.

देशातील लोकशाही टिकण्यासाठी आणि अर्थपूर्ण होण्यासाठी हे आवश्यक आहे. साक्षरता म्हणजे केवळ अक्षर ओळख नव्हे तर संपूर्ण जग जाणण्याचे ते कार्य आहे. या दिशेने, गावागावातील लोकांच्या खांद्याला खांदा भिडवून, आम्ही पुढे जाऊ इच्छितो.




**भारत ज्ञान विज्ञान समिती**

किंमत रु.२-५०

# गडबड घोटाळा

## सफदर हश्मीच्या कविता

रुपांतर : वंदना भागवत



**भारत ज्ञान विज्ञान समिती**

पुस्तकाचे नाव : गडबड घोटाळा

लेखक : सफदर हाश्मी
रुपांतर : वंदना भागवत

चित्रकार : बिंदीया थापर

'सहमत' च्या सौजन्याने

जवाआं/२१

प्रकाशन : फेब्रुवारी १९९७

नववाचकांसाठी भारत ज्ञान विज्ञान समिती तर्फे राष्ट्रीय साक्षरता मिशनच्या सहकार्याने देशभर चालवल्या जात असलेल्या 'जनवाचन आंदोलन' मोहिमेसाठी प्रकाशित

मूल्य : २ रुपये ५० पैसे



प्रकाशक : दत्ता देसाई
राज्य समन्वयक, भारत ज्ञान विज्ञान समिती (महाराष्ट्र)
अक्षय, २१६, केळकर रस्ता, नारायण पेठ, पुणे ४११०३०
फोन : ४५६६९४
मुद्रण स्थळ : महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय, पुणे ४११००४

अक्षर जुळणी व मांडणी : दिनानाथ मनोहर

# १.गडबड घोटाळा



गडबड झाली हो गडबड झाली
किल्लीच्या आत कुलुपाची बंदी
घर गेलं आत,बाहेर आली खोली
गोठा गेला गायीत, अशी मजा झाली

दातांत गेले ओठ
आणि भाजीमध्ये ताट
कापसाच्या आत उशी
आणि चहात गेली बशी

डोकं बसलं टोपीवर
आणि रस्ता चढ़ला गाडीवर
डोळे बसले चष्म्यावर
अन् वही पुस्तकात दप्तर

कोळयामध्ये अडकले जाळे
चिखलात वाहती नाले
समजत नाही असे सगळे
कसे गडबडीत झाले !

थांबवू गडबड सगळी
कुलुपात घालू किल्ली

आणू खोली घरात
बांधू गाय गोठ्यात

दात घालू तोंडात
भाजी वाढू ताटात
कापूस ठोसू उशीत
आणि चहा ओतू बशीत



टोपी ठेवू डोक्यावर
गाडी चालवू रस्त्यावर
चष्मा घालू डोळ्यांवर
अन् दप्तर आलं पुस्तकांवर

पायावर उभे राहू
नाकानं श्वास घेऊ
पोटभर जेवू खाऊ
डोळे मिटून डुलक्या घेऊ

कोळी धावतो जाळ्यात
चिखल वाहतो नाल्यात
संपला गडबड घोटाळा
डोक्यातील गोंधळ दूर आता पळाला!



## २ .थंडी

आली हवा पावसाळी
आली गोठायची पाळी
माणसे जाडी नि हडकुळी
घालती कपड्यांच्या खोळी
अहाहा... वाजते थंडी
उ..हू..हू वाजते थंडी

नाके लालेलाल झाली
पावले थंडगार पडली
कड्..कड्..कड्..
थर्..थर्..थर्
पळ्..पळ्..पळ्..
भर्..भर्..भर्
बसा सगळी उन्हात
किंवा सावलीच्या जाळ्यात
तरी वाजते थंडी
अ..हा..हा.. वाजते थंडी





गुडुप पांघरूणात तरीही थंडी
पांघरूणाबाहेर थंडीचथंडी
बाहेर थंडी, घरात थंडी
कोंबडीची गोठून गेली अंडी
अ..हा..ही वाजते थंडी

कुड्..कुड्..कुड्..कुड्
थड्..थड्..थड्..थड्
अंगामध्ये भरली थंडी
द् ..दु..दु..दुष्ट ही थंडी,
अ..हा..हा.. वाजते थंडी.

## ३.राजू आणि काजू

राजू आणि काजू
दोघे मित्र सख्खे
हातात हात घालून
गेले बाजारामध्ये

धक्काबुक्की गर्दीच गर्दी
बघून झाले दोघे चाट
जिकडे तिकडे गर्दीच गर्दी
पायाखालची दिसेना वाट

इकडे दुकान तिकडे दुकान
आतही दुकान बाहेर दुकान

फूटपाथवरचे फेरीवाले
बिल्डिंगातले शोकेसवाले
सुंदर सजलेली दुकाने
खचाखच भरलेली दुकाने

सगळीकडे ठेवले होते
पणत्या आणि फटाके





फुलबाज्या भुईनळे
चमनचेड्या, बाण,गोळे

राजूने घेतल्या फुलबाज्या
थोड्या पणत्या, थोड्या वाती
म्हणाला, 'मला रंगीत रंगीत
दिवे भारी आवडती'

काजू म्हणाला,''हॅट
आपण घेणार बॉम्ब नि बाण,
धडाम धुडूम आवाज करून
सगळ्यांचे करू बहिरे कान''

दोघे घरी परतले
खूप खूप खेळले
एकाने बॉब फटाके उडवले
पणत्या दिवे दुसऱ्याने लावले

काजूचे बॉब, मिनीटात खलास मात्र
भरून राहिला दारूचा वास
राजूची पणती संथ तरी
तेवत राहिली रात्र सारी



## ४.लौकर बरे व्हा

लवकर लवकर बरे व्हा
काविळीला हाकलून द्या

एक हुंकार भरून जोरदार
काविळीला घालवा पार



थोडे दिवस बंद, लोणी नि तूप
पालकाची भाजी, चागंली खूप

बाबांना सांगा मुळा आणा
आईला सांगून ऊस आणा

एवढंच फक्त - बाकी बंद
काविळीला रस्ता बंद!

## ५.थंडी जाता

घराबाहेर दबकत दबकत
निघून चालली थंडी
आकाशदेखील मोकळं झालं
जुनकट कोटाची सोडून गुंडी.

सकाळी सकाळीच सूर्य येऊन
उन्हाची दुलई उघडतो.
दबक्या पावलांनी हिवाळा
आपल्या वाटेने जातो.



उन्हाच्या शेकोटीशी होती
घरांचे कोपरे गरम.
टाचा, तळवे अन् बोटेही
होती उष्ण नरम.



गरज संपली हातमोज्यांची
मफलर, स्वेटर्सचीही
ठेवून दिली शाल आईने
कोट काढती बाबाही.

लौकर उठायला हरकत नाही
पांघरूणही फेकून दिले
नळाचे पाणी कोंबट झाले
तोंड धुवायला सोपे

आभाळ झाले निळे निळे
अन् ढगही गायब झाले
पक्षी किलबिल करू लागले
झाडे मिरवती हिरवे तुरे

उन्हाळ्यामागून येई हिवाळा
शीत, थंड झुळुकांचा
तोही तेव्हा हवाहवासा
आत्ता जसा उन्हाळा

छान उन्हाळा छान हिवाळा
सगळे ऋतु छान

सदैव रहातो मजेत आम्ही
आम्ही मुलेही छान!

## ६.तुरतुर, सुरसुर

तुरतुर, सुरसुर
एक उडी सरकन्
झाडावर, बुंध्यावर
फांदीवर झपकन्.

हिंडत हेलकावत
गोल गोल गिरक्या
इकडून तिकडे, तिकडून इकडे
उडी पायावर तिरक्या

बुडबुडी, सुळसुळी
शेपटी तरी कसली
कोनावरचे आईस्क्रिम किंवा
लवलवती जणू सळई





खाऊ बघा खाते कशी
शेंग फोडून टुचदिशी
चाहूल लागता जराशी
पळून जाई सुर्रदिशी.

## ७.छोटीची कमाल

समरदादा भलतेच भारी
म्हणती,'सायली फुसकी छोटी
मी जर आहे बटाटेवडा,
तर ही पातळ कांदा भजी.

मी कसला उंच नि तगडा,
ही असली चिंगळी, दुबळी
मी दणकट दोरखंड,
ही तर कच्ची सुतळी'





पण बसले जेव्हा सीसॉवर
कळून चुकले त्यांना
छोटी गेली उंचावरती
समरदादांना ठेवून खाली.

## पिल्लू

निलूकडचं पिल्लू
मऊ मऊ छान
छोटेसे पाय
शेपूट लांब लांब



भुरकट दाढी
काळ्या मिशा
माशीशी मस्ती
सारख्या उठाबशा

## ८. शिवाचा अंगठा



शिवाच्या अंगठ्याला काय झालं?
माहितीय का?
शिवाच्या अंगठ्याला चांगलंच लागलं
माहितीय का?



रक्त आलं. अंगठा सुजला. पट्टी बांधली.
माहितीय का?





शिवा ओरडला, ''पट्टी नको-औषध नको.''
माहितीय का?
कळ आली. चांगली जोरात. बोंब झाली.
माहितीय का?



पळत आला. रडत आला. हाय्..हाय् करत
माहीतीय का?
लिलू म्हणाली, ''काय रे हे? औषध घे.''
माहितीय का?
हात झटकून म्हणाला तो, ''मी नाही घेणार.''
माहितीय का?
''औषध कसलं! शेंगदाणाच मोठा. नको मला''
माहितीय का?
''असं कसं चालेल? पट्टी बांध. औषध घे.'' लिलू म्हणाली.
माहितीय का?
शिवानं औषध घेतलंच नाही. मग काय झालं?
माहितीय का?
शिवाचा अंगठा सुजलाच सुजला. खूप खूप सुजला.
माहितीय का?

# ९ .स्वातंत्र्य

कालच आमच्या आजोबांनी
झेंड्यांची भिरभिरी आणली
घरीच बसून बाबा आई
बघत होते टी. व्ही.



दिल्लीमध्ये स्वातंत्र्यदिनाचा
सोहळा चालू होता
तिरंगी झेंडा एकटा
सर्वात उंच फडकत होता

बँडच्या तालात कवायत
जवान कडक करती
हिरवळीवरती मुले माणसे
चणे कुरमुरे खाती

सगळे म्हणती आजच्या दिवशी
झाला आपला देश स्वतंत्र
आजच्या दिवशी झाला होता
ब्रिटीश सत्तेचा अंत

स्वातंत्र्य, देश आणखी काही
आपल्याला बिलकुल समजत नाही
आम्ही आपले गच्चीवरती
खेळतो पतंगांची काटाकाटी



आम्हाला विचाराल, 'मुलांनो,
स्वांतंत्र्य म्हणजे काय रे?
आम्ही म्हणू , 'हात्तिच्या!
सगळ्यांचा सुट्टीचा दिवस रे!'

